**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी या योजनेकरिता सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१७ ते जुलै, २०१७ या चार महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः-अविवि-२०१७/प्र.क्र.७५/का-९**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक - २६ मे, २०१७.

**वाचा:-** (१) शासन परिपत्रक , वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८ एप्रिल, २०१७.

(२) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.१/का-४/२०१६-१७, दि.१५ एप्रिल, २०१७.

**प्रस्तावना**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयामार्फत "राज्यातील अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, अल्पसंख्याकांशी निगडीत बाबी हाताळणारे प्रशासनातील अधिकारी / कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण व राज्य शासनाने अल्पसंख्याकांसाठी घोषित केलेल्या योजनांना प्रसिध्दी" या योजनेकरिता सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१७ ते जुलै, २०१७ या चार महिन्यांचा खर्च भागविण्याकरिता मंजूर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक "मागणी क्र. झेड ई-१, मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० व इतर कार्यक्रम २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनेंतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी याकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१८७) ३१, सहायक अनुदान " या लेखाशीर्षांतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता रू. १,९०,००,०००/- (अक्षरी रू. एक कोटी नव्वद लक्ष फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. माहे एप्रिल, २०१७ ते डिसेंबर, २०१७ करिता सदर मंजूर निधीच्या ८० % निधी मर्यादेपर्यंत वितरीत करण्यासाठी उपरोक्त क्र. १ येथील शासन परिपत्रकान्वये मान्यता देण्यात आलेल्या आहेत. त्यास अनुसरून संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी या योजनेकरिता निधी वितरणाची मागणी केली आहे. माहे एप्रिल २०१७ ते जुलै, २०१७ या चार महिन्यांकरीता रू.६३,३३,३३२/- (अक्षरी रू. त्रेसष्ठ लक्ष तेहतीस हजार तीनशे बत्तीस फक्त) इतके

अनुदान खाली दर्शविलेल्या मासिक निधी विवरणाप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांनी खर्च विहीत मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात योजनांतर्गत बाबीसाठी माहे एप्रिल, २०१७ ते जुलै, २०१७ या चार महिन्यांकरिता महत्त्वाच्या बाबींकरिता खालीलप्रमाणे योजनेतर अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

| **"मागणी क्र. झेड ई-१, मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० व इतर कार्यक्रम २००इतर कार्यक्रम, राज्य योजनेंतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी याकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१८७) ३१, सहायक अनुदान"** | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | **माहे एप्रिल, २०१७ ते जुलै, २०१७ या चार महिन्यांकरिता मंजूर अनुदान** | | | |
| **अ. क्र.** | **तपशीलवार लेखाशीर्ष** | **सन २०१७-१८ साठी अर्थ संकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान** | **एप्रिल, २०१७** | **मे, २०१७** | **जून, २०१७** | **जुलै, २०१७** |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | **२२३५ ए १८७** | १,९०,००,०००/- | १५,८३,३३३/- | १५,८३,३३३/- | १५,८३,३३३/- | १५,८३,३३३/- |
| | **एकूण** | | **रू.६३,३३,३३२/- (अक्षरी रू. त्रेसष्ठ लक्ष तेहतीस हजार तीनशे बत्तीस फक्त)** | | | |

२.	सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०१७-१८ च्या मासिक निधी विवरण पत्रात दर्शविल्याप्रमाणे आपल्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेपर्यंतच करावा. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) तसेच संदर्भ क्र. १ शासन परिपत्रक, वित्त विभाग अन्वये विहीत अटी व तरतूदींचे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने करावे.

३.	उपरोक्त रक्कम "मागणी क्र. झेड ई-१, मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० व इतर कार्यक्रम २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनेंतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी याकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१८७) ३१, सहायक अनुदान" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

४.	" सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास

प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/ अर्थ-३, दि. १८ एप्रिल, २०१७ मधील परिच्छेद ७ ते १८ येथील अटींची व त्यासोबतच्या परिशिष्टांमधील अ.क्र. ३ व ९ मधील अटींची पुर्तता होत असून प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. ”

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२६१६३६१५३८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MINORITY DEVELOPMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bcd09896471a6f90b80581ca42d45e27f07ad7e99a45bec3a7579cf10330fcd, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2017.05.26 16:40:03 +05'30'

**(अशोक गायकवाड)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु. सचिव,
३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
७) संचालक, लेखा व कोषागारे
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
११) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
१२) व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई,
१३) व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्प. आर्थिक विकास महामंडळ, मुंबई,
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वफ्क महामंडळ, औरंगाबाद,
१५) कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई,
१६) अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई,
१७) कक्ष अधिकारी (का. ७ व ८), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८) निवडनस्ती (कार्यासन-९)